शासकीय वाहनांचा खाजगी कामासाठी वापर

---दर सूधारणा

महाराष्ट्र शासन

वित्त विभाग

शासन निर्णय, क्रमांक : प्रवास-१००५/प्र.क्र.३३/सेवा-५,

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२, दि. ८ जुलै, २००५

पहा : शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक:प्रवास - १०९०/प्र.क्र.३२०/९०/सेवा-५, दिनांक १७ ऑक्टोबर, १९९०

## शासन निर्णय

शासकीय वाहनांच्या खाजगी वापरासाठी आकारावयाचे दर वर नमूद केलेल्या दि. १७ ऑक्टोबर, १९९० च्या आदेशान्वये विहीत करण्यात आले आहेत. या दरात सुधारणा करण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता.

२. याविषयी शासन आता असे आदेश देत आहे की, पेट्रोल वा डिझेलवर चालणा-या सर्व शासकीय वाहनांच्या खाजगी वापरासाठी यापुढे सरसकट रु. ८/- (रुपये आठ) प्रति किलोमीटर या दराने वसुली करण्यात यावी.

शासकीय वाहनाच्या खाजगी वापरासाठी घालण्यात आलेली प्रति माह २५० किलोमीटर ही कमाल मर्यादा यापुढेही लागू राहील. या मर्यादेपेक्षा अधिक खाजगी वापरास परवानगी देण्यात येऊ नये.

३. शासकीय वाहन खाजगी वापरात असताना,त्यासाठी असलेला खोळंब्याचा (Detention) दर यापुढे प्रति तास रु. ३/- व कमाल रु. ३०/- प्रति दिवस इतका असेल. खोळंब्याचा काळ मोजताना पूर्वीप्रमाणेच पहिल्या तीन तासांचा वापर सोडण्यात यावा.

४. हे आदेश सार्वजनिक क्षेत्रातील उपक्रम,मंडळे इत्यादींकडील वाहनांच्या खाजगी वापरासाठीही लागू आहेत.मंत्रालयातील संबंधित प्रशासकीय विभागांनी त्यांच्या नियंत्रणाखाली असलेल्या सार्वजनिक क्षेत्रातील उपक्रम, मंडळे इत्यादींच्या नजरेस हे आदेश आणावेत.

५. **हे आदेश दि. १ ऑगस्ट, २००५ पासून अंमलात येतील.**

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

मीना अ. जोशी

**शासनाच्या उपसचिव**

प्रत,

महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई,

महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर,

महालेखापाल-१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल-२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई,
राज्यपालांचे सचिव,
मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
उपमुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
सर्व मंत्री आणि राज्य मंत्री यांचे स्वीय सहाय्यक,
उपसचिव,सार्वजनिक उपक्रम कक्ष,वित्त विभाग,
मंत्रालयीन सर्व विभाग,
सर्व विभागीय आयुक्त,
विशेष आयुक्त,महाराष्ट्र सदन,कोपर्निकस रोड,नवी दिल्ली,
मंत्रालयाच्या सर्व विभागाखालील विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
* प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई,
* प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
* सचिव,महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई,
* प्रबंधक, लोक आयुक्त व उपलोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी हिशेब, मुंबई,
उप मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी हिशेब, मुंबई / पुणे / नागपूर / औरंगाबाद / नाशिक / अमरावती,
जनसंपर्क अधिकारी, मंत्रालय, मुंबई,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी,
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
वित्त विभागातील सर्व कार्यासने,
निवड फाईल,कार्यासन सेवा-५.
* पत्राद्वारे.